सन २०१८-१९ अखिल भारतीय नागरी सेवा स्पर्धा
आयोजनासाठी निधी वितरण

# महाराष्ट्र शासन
## शालेय शिक्षण व क्रीडा विभाग
## शासन निर्णय क्रमांक : निविप्र ४०१८/प्र.क्र.१२१/क्रीयुसे -२

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२
तारीख : १५ सप्टेंबर, २०१८.

**वाचा**

१. वित्त विभागाचे शासन परिपत्रक क्र. अर्थसं - २०१८ / प्र.क्र ६९ /अर्थ-३ ,दि.०२.०४.२०१८.
२. आयुक्त, क्रीडा व युवक सेवा,पुणे यांचे पत्र क्र.क्रीयुसे/अभानासे/निवि/२०१८-१९/का४/३१३८; दि.१०.०८.२०१८.

**प्रस्तावना -**

दर वर्षी राष्ट्रीय स्तरावर सुमारे १० खेळांसाठी अखिल भारतीय नागरी सेवा स्पर्धांचे देशातल्या विविध राज्यात आयोजन करण्यात येते. यापैकी १ (किंवा २ ) खेळांसाठीच्या स्पर्धांचे आयोजन महाराष्ट्र राज्यात केले जाते. सदर स्पर्धा आयोजनासाठी शासनाच्या वतीने अनुदान देण्यात येते. यास्तव महाराष्ट्र राज्यात सन २०१८-१९ या वर्षासाठीच्या अखिल भारतीय नागरी सेवा स्पर्धांच्या आयोजनासाठी अर्थसंकल्पित करण्यात आलेल्या निधीच्या वितरीत करण्याचीबाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

सन २०१७-१८ या वर्षा मध्ये अखिल भारतीय नागरी सेवा स्पर्धेचे आयोजन या योजनेसाठी रु.२५.०० लक्ष इतका निधी अर्थसंकल्पित आहे. त्यापैकी रु.१७.५० लक्ष (रुपये सत्तरा लाख पन्नास हजार फक्त) इतकी रक्कम वितरित करण्यास व सदर रक्कम आयुक्त, क्रीडा व युवक सेवा यांच्या अधिनस्त ठेवण्यास याद्वारे मान्यता देण्यात येत आहे.

२. उपरोक्त संदर्भात होणारा खर्च “माग्णी क्र. ०३, २२०४-क्रीडा व युवक सेवा- १०४ क्रीडा व खेळ ,०६ अखिल भारतीय नागरी सेवा स्पर्धा (०६) (०५) अखिल भारतीय नागरी सेवा स्पर्धेचे आयोजन (२२०४ १९९९) ३१ सहायक अनुदाने या लेखाशिर्षाखालील मंजूर तरतूदीमधून भागविण्यात यावा. सदरचे अनुदान ज्या प्रयोजनासाठी मंजूर करण्यात आले आहेत त्याच प्रयोजनासाठी खर्च करण्यात यावे.

३. वित्त विभाग दिनांक ०२.०४.२०१८ च्या परिपत्रकातील सूचनानुसार उपरोक्त तरतुद खर्च करण्याबाबतची कार्यवाही करण्यात यावी. यासाठी संबंधीत जिल्हा क्रीडा अधिकारी यांना आंहरण व संवितरण अधिकारी तर आयुक्त, क्रीडा व युवक सेवा यांना नियंत्रण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

४. सदरचा शासन निर्णय वित्त विभागाच्या दिनांक ०२.०४.२०१८ च्या परिपत्रकातील सूचनांना अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे. सदर परिपत्रकाच्या परिशिष्टातील अनुक्रमांक ८ मध्ये नमूद अटींची पूर्तता होत आहे. सदर परिपत्रकाच्या परिशिष्टातील मुद्दा क्र.१, २, ३, ४, ५, ६ व ७ मधील बाबी सदर आदेशास लागू नाहीत.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८०९१५११३६१८७२२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Rajendra Shankarrao Pawar

Digitally signed by Rajendra Shankarrao Pawar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=School Education and Sports Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=679184b88f7019ef64ad6ddc2495ca280267c0d4755ce63fa70c45cf755d9373, cn=Rajendra Shankarrao Pawar
Date: 2018.09.15 11:40:42 +05'30'

**( राजेंद्र पवार )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१.मा.राज्यपाल तथा अध्यक्ष, आंतरविद्यापीठ क्रीडा महोत्सव आयोजन समिती, मुंबई.
२.मा.मंत्री, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
३.मा.विरोधी पक्षनेता (विधानसभा / विधानपरिषद) यांचे स्वीय सहायक, मुंबई.
४. सर्व विधानसभा / विधानपरिषद सदस्य यांचे स्वीय सहायक.
५. प्रधान सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
६. आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे,
७. महालेखापाल (लेखा अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१ - मुंबई/महाराष्ट्र-२ नागपूर,
८. महालेखापाल (लेखा), महाराष्ट्र-१ - मुंबई/महाराष्ट्र-२ नागपूर
९. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई. (क्रीडा संचालनालयामार्फत)
१०. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी (क्रीडा संचालनालयामार्फत)
११. वरिष्ठ कोषागार अधिकारी, पुणे. (क्रीडा संचालनालयामार्फत)
१२. लेखाधिकारी, क्रीडा व युवक सेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे, (क्रीडा संचालनालयामार्फत)
१३. सर्व उपसंचालक व जिल्हा क्रीडा अधिकारी (क्रीडा संचालनालयामार्फत),
१४. वित्त विभाग (व्यय-५)/अर्थ-८/नियोजन विभाग (का.१४७१), मंत्रालय, मुंबई,
१५. कार्यासन अर्थसंकल्प, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई,
१६. निवड नस्ती (क्रीयुसे-२)